**जिल्हा अहमदनगर, येथील राहाता तालुक्यातील दक्षिण भागातील १५ ठिकाणी तलाठी कार्यालये तथा निवासस्थाने इमारती बांधकामांच्या अंदाजपत्रके व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीएलडी-३३१४/प्र.क्र.९८/ई-८,**
३२ वा मजला, सेंटर -१ इमारत,जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: ०९/०९/२०१४.

**वाचा:-**

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र. साप्रशा/कार्या/रवका/२००/२०१४, दि. २८/०५/२०१४.

**शासन निर्णय:-**

राहाता, जिल्हा-अहमदनगर तालुक्याच्या दक्षिण भागातील १५ तलाठी कार्यालये तथा निवासस्थाने इमारती बांधकामांसाठी येणाऱ्या रु. ४,९०,५३,०१५/- (अक्षरी रुपये चार कोटी नव्वद लक्ष त्रेपन्न हजार पंधरा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकाची सर्वसाधारण तपासणी करता खालील बाबी आढळून आल्या आहेत.-

१. सदर बांधकामाचे एकूण प्रस्तावित बांधकाम क्षेत्रफळ १३३८.१५ चौ. मी. ( ८९.२१ चौ. मी. x १५ ) आहे.
२. सदर बांधकामाचे अंदाजपत्रक शासनाचे वास्तुशास्त्रज्ञ यांनी तयार केलेल्या नकाशांवर आधारीत आहे.
३. सदर कामाचा सरासरी बांधकाम दररु. २४,५७०/- प्रति चौ.मी. घेतला असून एकत्रित दर रु. ३६,६००/- प्रति चौ.मी. असा आहे.
४. अंदाजपत्रक उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, राहाता यांनी तयार केले आहे. व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर यांनी साक्षांकित केले आहे.

५. अंदाजपत्रक सन २०१३-२०१४ च्या नाशिक जिल्हा दरसूचीवर आधारीत आहे. अंदाजपत्रकात फर्निचरची तरतूद ढोबळ स्वरुपात अंदाजे रु. ७,५०,०००/- करण्यात आली आहे. सदरील कामास उपभोक्ता खात्याची सहमती गृहीत धरण्यात येत आहे. तसेच सदरील अतिरिक्त बाबीच्या किमती या ढोबळ स्वरुपात असून त्याबाबतची प्राथमिकता उपभोक्ता खात्याने त्यांचे स्तरावर ठरवावी. कामाची निकड लक्षात घेता सदरील बाबी ढोबळ स्वरुपात केल्याप्रमाणे ठेवण्यात येत आहेत.

६. अंदाजपत्रकात ४ टक्के आकस्मिक खर्च, ११ टक्के विद्युतीकरण, ८ टक्के पाणीपुरवठा व मलनिस्सारण, १ टक्के लेबर इन्सुरन्स इ. ची तरतूद योग्य करण्यात येत आहे. तर संगणकीय चार्जेसची तरतूद वगळण्यात येत आहे.

३. (अ) बांधकाम सुरु करण्यापूर्वी सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन त्यास संबंधित मुख्य अभियंता यांचे साक्षांकन घेण्यात यावे.

(ब) बांधकाम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(क) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

(ड) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१ दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. प्रस्तुत बांधकामाच्या अंदाजपत्रकात वरील प्रमाणे सुधारणा व दुरुस्ती करुन १५ ठिकाणी तलाठी कार्यालये तथा निवासस्थाने इमारती बांधकामांच्या रु. ४,९०,५३,०१५/- (अक्षरी रुपये चार कोटी नव्वद लक्ष त्रेपन्न हजार पंधरा फक्त) इतक्या रक्कमेस वरील परिच्छेद क्रमांक ३ (अ), (ब), (क) व (ड) मधील अटींच्या अधीन राहून अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाची सहमती आहे.

५. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना जिल्हा प्रशासन - मागणी क्रमांक एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. मात्र सदरच्या खर्चासाठी अंदाजपत्रकामध्ये तरतुद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये.

६. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१००८/प्र.क्र.-७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ मधील भाग- पहिला, उपविभाग- पाच मधील अनुक्रमांक १, नियम क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१२०५४५०२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.09.09 15:21:28 +05'30'

( चं. नि. पाडळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
जिल्हाधिकारी, अहमदनगर.
प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा परिक्षा), मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
तहसिलदार, राहाता, जि. अहमदनगर.
सार्वजनिक बांधकाम विभाग, ( कार्यासन इमा-३ ), मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग, कार्यासन-१४७५, मंत्रालय, मुंबई-३२.
वित्त विभाग, ( कार्यासन व्यय-९ / विनियम ), मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई-०५.